नांदेड - वाघाळा शहर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने संमत केलेला ठराव क्र. १६३ दि.२४.१.२०१३ व स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र. १०८ दि. १.१२.२०१४ अंतिमत: विखंडित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : नावाशमनपा-२०१६/प्र.क्र.९०/१६/नवि-२४**

मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- ५ जानेवारी, २०२२

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांक : नावाशमनपा-२०१६/प्र.क्र.९०/१६/नवि-२४ दि.१९.८.२०१६
२) आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. जा.क्र. नांवाशमनपा/आस्था-६/५८८२/२०२१ दि. ६.९.२०२१

**प्रस्तावना :-**

श्री. मुस्तफा बंदे अली, लिपीक, आरोग्य विभाग यांना नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी महानगरपालिकेच्या कामात रक्कमेच्या अपहार प्रकरणी त्यांना दि. २०.११.२०१२ च्या कार्यालयीन आदेशान्वये सेवेतून कायमचे कमी करण्यात आले. त्यांना पुर्ववत कामावर पुर्नस्थापित करण्याबाबत नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने संमत केलेला ठराव क्र. १६३ दि. २४.१.२०१३ व स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र. १०८ दि. १.१२.२०१४ सदर दोन्ही ठराव विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी शासनास केली आहे.

२. (१) श्री मुस्तफा अली बंदे अली, लिपीक, आरोग्य विभाग यांना नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका क्षेत्रातील सोनोग्राफी सेंटर, जेनेटिक लॅब, जेनेटिक कॉन्सलिंग सेंटर धारकांच्या नोंदणीचे व नुतनीकरणाचे काम देण्यात आले होते. त्यांनी वसुल केलेल्या फिची रक्कम महानगरपालिका फंडात जमा केली नसल्यामुळे त्यांना महानगरपालीकेच्या दि ०२.०७.२००८ च्या कार्यालयीन आदेशान्वये निलंबित करण्यात आले होते.

(२) तदनंतर दि १९.०४.२०१० च्या कार्यालयीन आदेशान्वये विभागीय चौकशीच्या अधिन राहून त्यांना सेवेत पुन:स्थापीत करण्यात आले.

(३) तदनंतर, दि ०८.०८.२०१२ रोजी चौकशी अधिकाऱ्यांनी चौकशी अहवाल सादर केला. सदर चौकशी अहवालात श्री मुस्तफा अली बंदे अली हे दोषी आढळून आले व त्यानी रु. ६७,५००/- इतकी रक्कम महानगरपालिका फंडात जमा न करता सदर रकमेचा अपहार केल्याचे नमुद केले होते.

(४) त्यामुळे संबंधितास सेवेत ठेवणे महानगरपालिकेच्या आर्थिक हिताचे वाटत नसल्यामुळे तसेच चौकशीअंती ते दोषी असल्याचे सिध्द झाल्यामुळे श्री मुस्तफा अली बंदे अली, लिपिक यांना मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम ५६(२) (ग) अन्वये महानगरपालिकेने कार्यालयीन आदेश दि. २०.११.२०१२ नुसार सेवेतुन लिपिक या पदावरुन कायमचे कमी करण्यात आले.

(५) त्या विरोधात श्री. बंदे अली , यांनी दि १९.१२.२०१२ रोजी नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका सर्वसाधारण सभेसमोर अपील केले.

(६) सर्वसाधारण सभेने महानगरपालिकेच्या सदर कार्यालयीन आदेशाविरुध्द ठराव क्र. १६३ दि २४.०१.२०१३ संमत करुन श्री. मुस्तफा अली बंदे अली यांच्या दोन वार्षिक वेतनवाढी कायमस्वरुपी बंद करुन त्यांना सेवेत पुन:स्थापीत केले. सर्वसाधारण सभेने संमत केलेला सदरील ठराव हा महानगरपालिकेच्या आर्थिक नुकसानीचा असल्याने त्यावर महानगरपालिका प्रशासनाने कोणतीही वैधानिक कार्यवाही करण्यात आली नाही व संबंधिताने अपहारीत केलेली रक्कम रु ६७,५००/- ही महानगरपालिका फंडात जमा न केल्यामुळे भा.द.वि. कलम ४०६,४०९ व ४२० अन्वये वजिराबाद पोलिस स्टेशन येथे दि २१.०४.२०१४ रोजी फौजदारी गुन्हा दाखल करण्यात आला आहे.

(७) तद्नंतर, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका स्थायी समितीने दि १.१२.२०१४ च्या ठराव क्र १०८ अन्वये श्री मुस्तफा अली बंदे अली, यांच्या २ वार्षिक वेतनवाढी कायमच्या बंद करुन पुर्ववत सेवेत पुन:स्थापित करण्यास मान्यता दिली.

३. नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका सर्वसाधारण सभेने तसेच स्थायी समितीने पारीत केलेले सदर ठराव हे नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेस आर्थिकदृष्टया नुकसानीचे असल्याने नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेचा सर्वसाधारण सभेचा ठराव क्र. १६३ दि २४.०१.२०१३ व स्थायी समितीचा ठराव क्र. १०८ दि ०१.१२.२०१४ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१(१) अन्वये प्रथमत: १ महिन्याच्या कालावधीसाठी शासन निर्णय दि. १९.८.२०१६ अन्वये निलंबित करण्यात आले होते.

४. सदर ठराव निलंबनाबाबत श्री. मुस्तफा अली बंदे अली यांची दि. २२.०९.२०१६ व दि. १८.२.२०१९ ची निवेदने शासनास प्राप्त झाली. सदर निवेदनांमध्ये श्री. मुस्तफा अली बंदे अली यांनी खालीलप्रमाणे मुद्दे नमुद केलेले आहेत.

अ) दि. १७.१२.२०१२ रोजी आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी अपीलार्थीकडुन रु. ६७,५००/- इतक्या रक्कमेचा भरणा करुन घेण्याचे स्पष्ट लेखी निर्देश महानगरपालिकेस दिले असतानासुध्दा व अपीलार्थी, श्री. मुस्तफा अली बंदे अली हे सदर रक्कमेचा भरणा करण्यास तयार असताना सुध्दा महानगरपालिका प्रशासनाने त्यांचेकडुन सदरील अपहार झालेल्या रक्कमेचा भरणा करुन घेतलेला नाही. सदर रक्कमेचा भरणा करुन घेवून पुन:श्च सेवेत घेणेबाबत त्यांनी दि. २२.९.२०१६ च्या निवेदनाव्दारे विनंती केली आहे.

आ) मी आरोग्य विभागात कार्यरत असताना मुंबई नर्सिंग होम रजिस्ट्रेशन अधिनियम १९४९ अन्वये सोनोग्राफ़ी सेंटर, जिनेटीक लॅब, जिनेटिक क्लिनीक व जिनेटिक कॉन्सिलींग सेंटर धारक डॉक्टर्स व वैदयकीय क्षेत्रातील अधिकारी यांना परवाना व नुतनीकरणाची फ़ी वसूल करण्यासाठी कर्तव्यावर होते. सदर विभागात काम करीत असताना माझ्या कडुन

नजरचूकीने भरणा न झालेली रक्कम रु. ६७,५००/- बाबत माझी चौकशी अधिका-यांकडून चौकशी करण्यात आली. चौकशी अहवालानुसार माझ्या वरील बहुतांश दोषात तथ्य नसल्याचे दिसून आले आहे.कमी भरणा केलेली रक्कम महापालिकेने माझ्या खात्यातून माझ्या संमतीनुसार वसूल केलेली आहे. मला दिलेली शिक्षा अत्यंत कठोर व अन्यायकारक असून मला सेवानिवृत्ती वेतन मंजूर करण्याकरीता महानगरपालिकेस आदेश देण्याची विनंती श्री. बंदे अली यांनी त्यांच्या दि. १८.२.२०१९ च्या निवेदनाव्दारे केली आहे.

इ) तसेच उप महापौर, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनीही अपहाराची रक्कम जमा केल्याचे दिसून येत असल्यामुळे श्री.मुस्तफ़ा अली बंदे अली, यांच्या बडतर्फीच्या आदेशात सेवानिवृत्ती अशी दुरुस्ती करण्याबाबत शासन मान्यता द्यावी अशी विनंती त्यांच्या दि. ३१.१.२०१७ च्या पत्राव्दारे केली आहे.

५. श्री.मुस्तफ़ा अली बंदे अली, बडतर्फ़ लिपीक यांनी रुपये ६७,५००/- इतक्या रक्कमेचा अपहार केल्यामुळे त्यांच्या विरुध्द पोलिस स्टेशनमध्ये येथे फ़ौजदारी गुन्हा दाखल असून सद्या प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे. त्यामुळे श्री.मुस्तफ़ा अली बंदे अली, बडतर्फ़ लिपीक यांना महानगरपालिका सेवेत पुर्ववत लिपीक या पदावर पुनस्थापित करता येणार नाही, त्यानुसार सर्वसाधारण सभेचा ठराव क्र. १६३ दि. २४.१.२०१३ व स्थायी सभेचा ठराव क्र. १०८ दि. १.१२.२०१४ हे दोन्ही ठराव अंतिमत: विखंडीत करण्याबाबत आयुक्त, नांदेड वाघाळा महानगरपालिका यांनी त्यांच्या दि. ६.९.२०२१ च्या पत्राव्दारे शासनास कळविले आहे.

६. या प्रकरणी असे दिसून येते की, श्री.मुस्तफ़ा अली बंदे अली, यांची प्रथमत: दि. २१.६.१९८३ रोजी शिपाई या पदावर झालेली असून त्यांना दि. १०.३.१९८६ मध्ये कॉम्युटर कम क्लर्क या पदावर पदोन्नती देण्यात आली होती. यु. आय. एस मनपा रक्कमेचा अपहार केल्यामुळे त्यांना दि. १०.४.१९८९ च्या आदेशान्वये निलंबित करण्यात आले होते. संबंधितांचा निलंबन काळ सहा महिन्यापेक्षा जास्तीचा झाल्यामुळे त्यांना कामावर रुजू करुन घेण्यात आले. या प्रकरणी झालेल्या चौकशी अहवालानुसार त्यांची एक वार्षीक वेतनवाढ कायस्वरुपी रोखण्यात येवून त्यांचा निलंबन कालावधी हा निलंबन काळ म्हणून दि. १९.११.१९९९ च्या आदेशान्वये गृहित धरण्यात आला आहे.

तदनंतर, अनधिकृतपणे गैरहजर राहिल्याबाबत व खोटे वैदयकीय प्रमाणपत्र दाखल केल्यामुळे दि. २.७.२००८ च्या आदेशान्वये त्यांना पुन्हा निलंबीत करण्यात आले होते. त्यानंतर संबंधितास त्यांच्या विनंती अर्जानुसार विभागीय चौकशीच्या अधिन राहून दि. १९.४.२०१० च्या आदेशान्वये सेवेत पुनस्थापित करण्यात आलेले असल्याचे नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या दि. १६.१.२०१७ च्या अहवालावरून दिसून येते.

तदनंतर श्री. बंदे अली, आरोग्य विभागात लिपीक या पदावर कार्यरत असताना पावती पुस्तकाव्दारे वसूल केलेली रक्कम ६७,५००/- महानगरपालिका फ़ंडात जमा न करता त्याचा अपहार केलेला आहे. याबाबत महानगरपालिकेने त्यांच्याविरुद्ध फ़ौजदारी गुन्हा दाखल केला आहे. श्री. बंदे अली, यांना यापुर्वी दोन वेळा निलंबित करून पुन्हा सेवेत रुजू करुन घेतल्याचे दिसून येते. त्यांची सदरची वर्तणूक ही बेजबाबदारपणाची तसेच कार्यालयीन शिस्तीच्या विरुध्द असल्याचे दिसून येते.

७. उपरोक्त वस्तुस्थितीनुसार श्री. बंदे अली, बडतर्फ़ लिपीक यांना सेवेत पुन्हा घेण्याबाबत महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने व स्थायी सभेने संमत केलेले ठराव अनुक्रमे क्र १६३ दि. २४.१.२०१३ व क्र. १०८ दि. १.१२.२०१४ हे महानगरपालिकेस आर्थिक दृष्ट्या हानिकारक असल्यामुळे सदर दोन्ही ठराव महानगरपालिका अधिनियमातील,१९४९ चे कलम ४५१(३) नुसार अंतिमत: विखंडित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेल्या वस्तुस्थितीनुसार नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेचा ठराव क्र. १६३ दि. २४.१.२०१३ व स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र.१०८ दि. १.१२.२०१४ हे नियमांशी विसंगत तसेच महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरुध्द असल्यामुळे, सदर दोन्ही ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२२०१०५१७१९१८०२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.01.05 17:22:20 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
२) मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. महापौर, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
४) नगर सचिव, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
५) मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
६) उप सचिव (नवि-२४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
७) निवड नस्ती (नवि-२४).